सन १९९१ च्या महापूरामुळे मौजे मोवाड, ता. नरखेड,जि. नागपूर येथील बाधित झालेल्या पुनर्वसित घरांसाठी दिलेले कर्ज माफ करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.सीएलएस-२०१४/प्र.क्र.२४/म-३,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २७ ऑक्टोंबर, २०१४**

**वाचा -**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएफएल-५९९१/प्र.क्र.६०८/म-३, दिनांक १३ सप्टेंबर, १९९१

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सीएलएस-०४०२/११ व्ही/प्र.क्र.१७२/म-३, दि.२१ मे, २००३

**प्रस्तावना :-**

सन १९९१ मध्ये वर्धा नदीला आलेल्या महापुरात नरखेड (जि. नागपूर) तालुक्यातील मोवाडसह १३ गावे पूरबाधित झाली. या पुरात सदर गावात प्राणहानी व वित्तहानी झाली. तसेच घरे वाहून त्यांची पडझड झाल्यामुळे शासनाने बाधित गावाचे नवीन व सुरक्षित स्थळी पुनर्वसन करण्याचा निर्णय घेतला. पुनर्वसनाच्या ठिकाणी शेतकरी कुटुंबाकरीता तीन हजार चौरस फूट जागेवर रूपये २५,०००/- खर्चाची घरे बांधून देण्यात आली असून यात प्रत्येकी रूपये १०,०००/- शासकीय अनुदान, रूपये १०,०००/- मुख्यमंत्री निधी व रू. ५,०००/- कर्ज म्हणून देण्यात आले होते. तसेच भूमिहीन शेतमजूरांकरीता रूपये १२,०००/- खर्चाचे बांधकाम करून देण्यात आले आहे.

सदर घटनेमध्ये बाधित झालेल्या व्यक्तींकरीता सुमारे २८१४ घरे बांधण्यात आली आहेत. या बाधित व्यक्तींमध्ये मोलमजूरी करणारे तसेच अल्प उत्पन्न गटातील व्यक्ती असल्यामुळे ते कर्जाची परतफेड अद्यापपर्यंत करू शकले नाहीत. त्यामुळे जिल्हाधिकारी, नागपूर यांनी मोवाड येथील खातेदारांचे घरे बांधण्याकरिता दिलेल्या कर्जापैकी रूपये ४७,६४,४३३/-एवढी मुद्दल व रूपये ६५,४३,६००/- एवढे व्याज अशी एकूण रूपये १,१३,०८,०३३/- एवढी रक्कम निर्लेखित करण्याचा प्रस्ताव सादर केला होता. त्याअनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २९ मे, २००३ नुसार जे थकबाकीदार घेतलेल्या कर्जाच्या रकमेचे दिनांक ३१ मार्च, २००४ पर्यंत संपूर्ण परतफेड करतील, अशा थकबाकीदारांना व्याजाची रक्कम माफ करण्याचा निर्णय शासनाने घेतला होता.

तथापि, नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यात ज्या पुर बधित गावांचे पुनर्वसन झाले त्या गावांमध्ये पुरेसा रोजगार उपलब्ध नसल्यामुळे बाधितांची आर्थिक स्थिती हलाखीची असल्यामुळे ते कर्ज व त्यावरील व्याजाची रक्कम परतफेड करू न शकल्याने त्यांच्यावरील कर्ज व त्यावरील व्याजाची रक्कम माफ करण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, नागपूर यांनी सादर केला असून, उपरोक्त प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

सन १९९१ च्या महापूरात नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यातील मौजे मोवाड सह १३ गांवातील २८८१ कुटुंबे पूर्णपणे बाधित झाली होती. सदर बाधित कुटुंबाच्या पुनर्वसनासाठी ३००० चौरस फूट जागेसह रू, २५,०००/- खर्चाची घरे बांधून देण्यात आली असून यात रू. १०,०००/- शासकीय अनुदान,रू. १०,०००/- मुख्यमंत्री सहायता निधीतून मदत व रू. ५,०००/- कर्जाचा समावेश आहे.

२. नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यातील मौजे मोवाड सह १३गावातील २८८१ बाधितांकडून रू. १,३६,४०,१७०/- मुद्दल रक्कम व रू. १,९९,२९,६१०/- व्याज अशी एकुण रू. ३,३५,६९,७८०/- इतक्या रकमेची वसुली करण्यास शिल्लक आहे. सदर रक्कम वसुल करणे अशक्य असल्याने मुद्दल रक्कम व त्यावरील व्याज (शासन निर्णय निर्गमित होईपर्यंतच्या दिनांकापर्यंत ) माफ करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

३. नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यातील पुरबाधित शेतक-यांकडून शासनाला येणे असलेल्या कर्जाची मुद्दल रू. १,३६,४०,१७०/- व त्यावरील व्याज १,९९,२९,६१०/- असे एकुण रू. ३,३५,६९,७८०/- एवढी रक्कम मुख्य लेखाशिर्ष “२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य,” या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावी व तद्नंतर मुद्दलाची रक्कम “६२४५-नैसर्गिक आपत्तीच्या सहाय्यासाठी कर्ज”या मुख्य लेखाशिर्षाखाली तसेच व्याजापोटी शासनास येणे असलेली रक्कम मुख्यलेखाशिर्ष -००४९-व्याजाच्या जमा रकमा॰ या लेखाशिर्षाखाली समायोजनाने वळती करून घेण्यास शासन मान्यता देत आहे. यासाठी आवश्यक असलेली तरतूद विहित मार्गाने अर्थसंकल्पित करून घ्यावी.”

४. सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७२/२०१४/व्यय-९, दिनांक ६ सप्टेंबर, २०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२८१२३२५३१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2014.10.28 14:29:48 +05'30'

(अ.रा.जगताप)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
२) जिल्हाधिकारी, नागपूर

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर
४) उपविभागीय अधिकारी, नागपूर विभाग, नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) महालेखापाल -१ व २ (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई
८) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई
९) वित्तीय सल्लागार व उप सचिव (कार्यासन म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (म-७ / म-११ / र-१२ / ब-१ / पीएसी/ पीएसी-१) महसूल व वन
११) विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (म-३ कार्यासन)